परिविक्षा कालावधीसंबंधीचे आदेश परिविक्षाधीन अधिकारी/कर्मचारी या दोहोंना लागू करण्याबाबत तसेच परिविक्षा कालावधी वाढविणे/समाप्त करणे किंवा परिविक्षाधीन अधिका-यास/कर्मचा-यास सेवेतून काढून टाकणे याबाबतचे आदेश वेळीच निर्गमित करण्याबाबत.

---

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक, क्रमांक: एसआरव्ही-1094/1837/प्र.18/95/आठ,
मंत्रालय, मुंबई-400 032, दिनांक 28 मार्च, 1995.

वाचा :-
(1) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:एसआरव्ही-1062/डी, दिनांक 26 एप्रिल, 1962.
(2) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही-1369/डी, दिनांक 15 मार्च,1969.
(3) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:एसआरव्ही-1280/1987/सीएन-226/आठ, दिनांक 11 मे, 1981.
(4) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:पीएससी-1080/1118/सीएन-82/80/आठ, दिनांक 7 मार्च, 1983.
(5) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही-1086/प्र.क्र.289/आठ, दिनांक 1 जानेवारी, 1987.
(6) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही-1094/प्र.क्र.5/94/आठ,दिनांक 3 फेब्रुवारी, 1994.

## प रि प त्र क

वर नमूद केलेल्या आदेशातील तरतुदी केवळ अधिकारी वर्गास लागू आहेत. गट "क" सवर्गास लागू नाहीत, असा मुद्दा काही मंत्रालयीन विभागांनी/कार्यालयांनी उपस्थित केला होता. त्यास अनुसरून स्पष्टीकरणात्मक सुधारित आदेश निर्गमित करावेत, असा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यासंदर्भात शासन आता असे आदेश देत आहे की, वर नमूद केलेल्या आदेशांतील तरतुदी परिविक्षाधीन अधिकारी तसेच परिविक्षाधीन कर्मचारी दोहोनांही लागू आहेत.

2. शासनाच्या असेही निदर्शनास आले आहे की, उपरोक्त दिनांक 15 मार्च, 1969 व दिनांक 7 मार्च, 1983 च्या आदेशामधील तरतुदीनुसार परिविक्षा कालावधी वाढविणे/परिविक्षाधीन कालावधी समाप्त करणे किंवा परिविक्षाधीन अधिकारी/कर्मचारी यांना सेवेतून काढून टाकणे याबाबतचे आदेश वेळीच निर्गमित केले जात नाहीत. त्यामुळे बरेच सेवाविषयक प्रश्न निर्माण होतात व न्यायालयात देखील अशा प्रकरणात आव्हान देण्यात येते. त्यास अनुसरून सर्व मंत्रालयीन विभागांना/नियुक्ती प्राधिका-यांना असे स्पष्ट करण्यात येत आहे की, परिविक्षा कालावधी वाढविणे/परिविक्षा कालावधी समाप्त करणे किंवा परिविक्षाधीन अधिकारी/कर्मचारी यांना सेवेतून काढून टाकणे याबाबतचे आदेश संबंधित परिविक्षाधीन अधिका-यांचा/कर्मचा-यांचा विहित परिविक्षा कालावधी संपल्याच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत निर्गमित करण्यात यावेत. या आदेशाचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित आस्थापना अधिका-याची राहील याची नोंद घेण्यात यावी.

3. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदरहू आदेश त्यांच्या नियंत्रणाखालील विभागप्रमुख/कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास आणावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

य. मा. जोशी,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

शा.म.मु.रोटा/साप्रवि/एच-107(4000-4-95)

(कृ.मा.प.)

प्रति,

1. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
2. मुख्य मंत्री यांचे सचिव,
3. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
4. सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
* 5. प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* 6. प्रबंधक, अपिल शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* 7. प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* 8. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* 9. सचिव, महाराष्ट्र विधानसभा सचिवालय, मुंबई,
* 10. सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई,
* 11. महालेखापाल, महाराष्ट्र-1 (लेखा व हक्कदारी), मुंबई,
* 12. महालेखापाल, महाराष्ट्र-1 (लेखा परीक्षा), मुंबई,
* 13. महालेखापाल, महाराष्ट्र-2 (लेखा व हक्कदारी), नागपूर,
* 14. महालेखापाल, महाराष्ट्र-2 (लेखा परीक्षा), नागपूर,
15. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
16. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
17. सर्व विभागीय आयुक्त,
18. सर्व जिल्हाधिकारी,
19. मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
20. निवड नस्ती.

---

* पत्राने.